**महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेवरील अपर निबंधक दर्जाच्या अधिकाऱ्याची प्रतिनियुक्तीने करावयाची नियुक्ती रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण १२२१ / प्र.क्र.१५३/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : १८ मे, २०२२

संदर्भ - १. शासन निर्णय समक्रमांक दिनांक २३.१२.२०२१
२. महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेचे पत्र क्रमांक १११/ बँकींग/ भाग विभाग/२५६/२०२१-२२ , दिनांक ३१.१२.२०२१

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने राज्य शासनाविरुद्ध थकहमीच्या रक्कमा मिळण्याबाबत मा. सर्वोच्च न्यायालयात सिव्हील अपील क्रमांक ३४४५/२०११ दाखल केले आहे. सदर याचिकेच्या अनुषंगाने राज्य शासन व महाराष्ट्र राज्य सहकारी बँक यांच्यामध्ये समन्वय साधन्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिपत्याखालील अपर निबंधक दर्जाच्या अधिकाऱ्याची महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेमध्ये प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत संदर्भ क्रमांक १, दिनांक २३.१२.२०२१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती.

उपरोक्त याचिकेच्या अनुषंगाने राज्य शासनामार्फत महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस दिनांक ३१.०३.२०११ च्या शासन आदेशान्वये थकहमीपोटी देण्यात आलेल्या रु. २७०.०० कोटीपैकी रु. १००.०० कोटीचा निधी भागभांडवल म्हणून वितरीत करण्यात आला होता. सदर निधी महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेद्वारे संदर्भ क्रमांक २, दिनांक ३१.१२.२०२१ च्या पत्राद्वारे शासनास परत करण्यात आला आहे. यास्तव सद्यस्थितीत महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेवर अपर निबंधक दर्जाच्या अधिकाऱ्याची नियुक्तीची आवश्यकता नसल्याने याबाबतचा दिनांक २३.१२.२०२१ चा शासन निर्णय रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने राज्य शासनाविरोधात थकहमीच्या रक्कमा मिळण्याबाबत मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या सिव्हील अपील क्रमांक ३४४५/२०११ च्या अनुषंगाने सहकार आयुक्त व निबंधक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिपत्याखालील अपर निबंधक दर्जाच्या अधिकाऱ्याची महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेमध्ये प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत निर्गमित केलेला संदर्भाधीन दिनांक २३.०१२.२०२१ चा शासन निर्णय रद्द करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०५१८११५०२०३५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2022.05.18 11:52:10 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
**विशेष कार्य अधिकारी तथा सहनिबंधक,**
**सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) उपसचिव (५-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, बँक ऑफ महाराष्ट्र, पुणे.
७) अध्यक्ष, प्रशासकीय मंडळ, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई.
८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई.
९) निवडनस्ती.